आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेसाठी अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचा निधी वितरीत करण्यास मान्यता.
(लेखाशिर्ष- २४०१ ए८९८)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१ / प्र.क्र.०७/ कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ३० मार्च,२०२२.

**वाचा -**

१. शासन आदेश, वित्त विभाग,क्रमांक:- अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१,दि.३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२. कृषि व पुदम विभागाची नस्ती क्रमांक फुंफला-२०२१/प्र.क्र.१७५/९-अे.

**प्रस्तावना :-**

राज्यात कृषि विभागामार्फत स्व.भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सन २०१८ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत लाभार्थी शेतकऱ्यांना देय अनुदान योजनेतील तरतूदीच्या अधिन राहून तीन वर्षात देण्याची तरतूद आहे. त्यानुसार अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांचे सन २०१८-१९ व २०१९-२० मधील प्रलंबित दायित्व अदा करण्यासाठी सन २०२१-२२ या वर्षात आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत तरतुदीमधून निधी उपलब्ध करून देण्याबाबत कृषि विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक २ येथील प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी मागणी क्र.टी-५, मुख्य लेखाशीर्ष २४०१-पीकसंवर्धन अंतर्गत भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेंतर्गत अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांचे सन २०१८-१९ व २०१९-२० मधील प्रलंबित दायित्व अदा करण्यासाठी वित्त विभागाच्या मान्यतेने सन २०२१-२२ या वर्षातील अर्थसंकल्पित तरतूदीतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव व लेखाशिर्ष | बाब क्रमांक | सन २०२१-२२ अर्थसंकल्पीत तरतूद | सुधारीत अंदाज सन २०२१-२२ | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना (२४०१ अे ८९८) | ३३-अर्थसहाय्य | ५००.०० | ३७५.०० | २५.२४ |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.२५.२४ लाख (अक्षरी रुपये पंचवीस लाख चोवीस हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषि विभाग यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर वितरीत निधीचा विनियोग अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांच्या सन २०१८-१९ ते २०१९-२० या वर्षातील प्रलंबित दायित्व अदा करण्याकरीता करण्यात यावा.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ येथील शा.नि.आदेशान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२९३/व्यय-१४,दि.२४.०३.२०२२ अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२९१३३६३३३९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.30 11:47:17 +05'30'

(रविंद्र दि.औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त( कृषि) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई